# जुने घर

मराठी : अश्विनी बर्वे

*ही गोष्ट अशा मुलांच्या मनाल स्पर्शून जाईल,*
*ज्यांना वाटते की कधी कधी त्यांची उपेक्षा*
*झाली होती..*



एक जुनि गोष्ट आहे.
एक जून घर होत.

जुने घर खूप एकटे होते. कारण खूप काळापासून त्या घरात कोणीच राहत नाही.

त्या घराच्या जर्जर फाटका समोरून जेव्हा लोक जात असत, तेव्हा ते एकदुसऱ्याला म्हणत, “तुम्ही कधी इतकं दुःखी घर पाहिलं आहे का?”



त्याचे मित्र त्याचं मन रिझवण्याचा प्रयत्न करत.

“तुझा किती उपयोग होतो,”पक्षी म्हणत, “तुझ्या छोट्या छोट्या छिद्रात आम्हांला आमची घरटी बांधणे सोयीचे जाते.



“तू उपकारी सुद्धा आहे. खार म्हणाली. “तुला नेहमी लक्षात असते मी शेंगा कुठे लपून ठेवल्या आहेत ते?”



“तू किती सहनशील आहेस, तुझा आम्हांला खूप उपयोग होतो,” जंगली फुलं म्हणाली. “तुझ्याशिवाय आम्ही सगळ्यांनी काय केलं असतं? तू किती सुंदर आहे.”

“आम्ही तुझ्यावर प्रेम करतो. लोकांना काहीही म्हणू दे.” पानांनी लगडलेली आपल्या फांदीने घराच्या छताला लपेटून घेत ओकचे झाड म्हणाले.

“स्वतःची अशी कीव करणे चांगली गोष्ट नाही,” ते सगळे म्हणाले.

पण काही उपयोग झाला नाही. “मी किती एकटा आहे,” जुने घर स्फुंदू लागले.

कधी कधी लोक जुने घर बघायला येत. पण ते निराश होवून परत जात.

“कोणी वेडाच या जीर्ण घरात राहण्याचा विचार करू शकतो,” एक जोडपं म्हणालं. “याची किंमत कमी केली आहे.”

“काय? जुन्या घर घाबरलेल्या आवाजात ओरडले, “माझी किंमत कमी केली आहे?”

रागाने त्याची खिडकीची दारे ‘खाडकन’ बंद झाली.

“या कचऱ्याच्या ढिगाला पाडून टाकलं पाहिजे,” एक माणूस घृणेने म्हणाला.

जेव्हा जुनं घर अशा गोष्टी ऐकते तेव्हा त्याच्या डोळ्यातून इतके अश्रू वाहतात त्याचे सगळे कोपरे ओले होतात. त्याच्या सगळ्या भागात वेदना होतात. त्याचे मित्र सुद्धा भीतीने कापतात.

एक दिवस एक कुटुंब जर्जर फाटकाजवळ येवून थांबलं.

“ओह!” आई म्हणाली. “अशा जुन्या अनोख्या घरात राहण्याचं स्वप्नं मी कितीवेळा पाहिलं आहे.”

“आपण कधीही एका असली घरात राहिलेलो नाही,” मुलगा म्हणाला. “आपण आत जावून बघू या का?”

तेव्हाच जुन्या घराने दुःखाने निःश्वास सोडला..



“उह-हा, हा कसला आवाज होता? वडील म्हणाले. “मला वाटतं इथं काहीतरी सडत आहे.”

“नाही!” छोट्या मुलीने ओरडून म्हटलं. “ते आपल्याला हॅलो करत आहे, बस एवढंच.”

“हे,” खारुताईने जुन्या घराला हळू आवाजात विचारलं, “तू त्यांचं बोलणं ऐकलं? ही तुझ्यासाठी चांगली वेळ आहे!”

पण जुन्या घराने नाक वर ओढून म्हटलं, “बघ! ते पण इतरांसारखे निघून जातील,”






पण पुढच्या आठवड्यात ते कुटुंब परत तिथं आलं. मोठ्या हौशीने त्यांनी घराकडे बघितलं.

“इथं मी टायर लावून झोका बांधेल. मुलाने ओकच्या झाडाकडे बघत म्हटलं.





“पक्ष्यांची घरटी तर बघा,” आई म्हणाली. “या घराने आपल्या मित्रांना किती जागा दिली आहे.”

“मी या जंगली फुलांच्या आसपास उगवलेल्या गवताला काढून टाकेन, म्हणजे या फुलांना चांगलं ऊन मिळेल,” मुलगी म्हणाली.



“तुला असं वाटतं का या घराचा कणा एका बाजूला झुकला आहे? वडील म्हणाले, “मला शंका आहे की याचा कणा तर तुटला नसेल ना?”

“क्षमा करा!” जुने घर रागाने ओरडून म्हणाले, “नाही माझा कणा तुटला नाही!”



“मग वाकू नको,”खारुताई म्हणाली, “सरळ उभं राहा!”

“मज़बूत हो,” ओकचे झाड म्हणाले. “थोडा प्रसन्न दिस.”

“ज़रा विचार कर ते किती निराश होतील,” पक्षी म्हणाले.

“तू करू शकतो!” जंगली फुलांनी हळूवार आवाजात सांगितलं.

जुन्या घराने आईकडे पाहिलं, ती घर घेण्यास उत्सुक होती. त्याने वडिलांकडे पाहिलं. त्यांना काही समजत नव्हतं. त्याने मुलगा आणि मुलीकडे पाहिलं, जे थोडे उत्सुक होते. त्याने बाळाचे बोबडे बोल ऐकले.

या कुटुंबाला माझी जरुरत आहे, जुन्या घराने विचार केला आणि त्याने खोल श्वास घेतला.

आपली पुरी शक्ती लावून ते हलल–डूलल .त्याने स्वतःला थोडं खेचलं, थोडा पसरलं, आणि जितकं शक्य होईल तितकं ते सरळ झालं.



“हे तर अजिबात वाकलेलं नाही,” मुलगा म्हणाला.

“तू बरोबर म्हणतो आहे,” वडील म्हणाले. “एक मिनिटभर त्याच्यावर सावली पडली असेल.”

मुलीने आपल्या आई-वडिलांकडे पाहिलं, “आपण हे खरेदी करू शकतो का?”

“घर खरेदी करण्यासाठी आपण पैशांची बचत तर करत आहोत, पण हे घर नीट करण्यासाठी आपल्याला मेहनत करावी लागेल,” आई म्हणाली..

“नक्कीच करावी लागेल,” वडील म्हणाले.



मग कुटुंबातले सगळे लोक तिथून जावू लागले.

“थांबा! नका जावू!” जुनं घर ओरडत म्हणाले, “आपण सगळे प्रसन्नतेने एकत्र राहू शकतो.”

पण कुटुंब निघून गेले होते.

जुनं घर खूप दुःखी होतं. “मी त्यांचं घर होवू शकलो असतो.” रडत ते म्हणाले. “मी त्यांना सुरक्षित ठेवलं असतं आणि थंडी पासून त्यांचं रक्षण केलं असतं.”

“तू पाहिलं का ते त्या कुटुंबासाठी दुःखी होत आहे.” खारू ताई ओकच्या झाडाला म्हणाली. “त्याने स्वतःची कीव करणं सोडून दिलं आहे.”

“मला माहीत आहे,” ओकचे झाड म्हणाले. “कमीत कमी ही एक चांगली गोष्ट तर झाली.”

एकदिवस सडकच्या किनाऱ्यावर जोरात आवाज आला.

“बुलडोज़र येत आहे!” जुनं घर रडत ओरडले. “हाच माझा शेवट आहे. आता सर्वनाश होईल.”

“आमच्या घरट्याना कोण वाचवेल?” पक्षी म्हणाले. “आमच्या पिल्लांना अजून उडताही येत नाही” “ते आम्हांला चुरगाळून टाकतील” जंगली फुल रडू लागली.



“मला माहीत आहे ते मलाही कापतील “ओक वृक्ष कण्हत म्हणाले. “अच्छा! जुन्या घरा, तू माझा चांगला मित्र होता.”

घाबरून ते सगळे रडू, ओरडू आणि कापू लागले होते.



पण अचानक जुन्या घराचे थरथर कापणे बंद झाले.

“हे!” ते आनंदाने ओरडले. “बघा! हे बुलडोझर नाही, माझा परिवार आहे.”

आणि तेच कुटुंब आले होते!



आईने जुन्या घराच्या खिडक्या इतक्या धुतल्या की त्या हिऱ्या सारख्या चमकायला लागल्या. चौकटींना तिने पांढरा रंग दिला.

वडिलांनी लाकडाचे नवे तुकडे ठोकून सगळी छिद्रे बंद केली. पक्ष्यांची पिल्ले वडिलांना काम करतांना पाहत होते..

“माझे सगळे कष्ट संपले,” जुनं घर म्हणाले.

जेव्हा मुलगा ओकच्या झाडाला झोका बांधून झोका घेत होता. खारूताई छोट्या बाळा बरोबर लपाछपी खेळत होती.

मुलीने जंगली फुलांजवळचे गवत काढले, त्यामुळे फुलांना ऊन मिळू शकेल. पक्ष्यांना खाण्यासाठी तिने बिया जमिनीवर पसरून दिल्या.

कुटुंबाने घर सावरण्यासाठी एवढी मेहनत घेतली की, जुनं घर नवीन वाटू लागलं.




आता जर जुनं घर कधी तऱ्हेवाईकपणे वागायचा ते दुःखाने नव्हे तर आनंदाने ते असं करायचं.कारण ते आता प्रेम आणि प्रसन्नतेने इतके भरले होते की त्याच्या जर्जर फाटका समोरून जातांना लोक नेहमी म्हणायचे:

"इतकं जुनं घर इतक सुखी कधी पाहिलं आहे का?"

समाप्त